ीपैंकेली॥ ४७॥ पंचेचाळिसाव्यांतएकनाथआख्यान॥ जनार्दनासिगेलेशरण॥ त्यासश्रीदत्तदर्शन॥ करूनिप्रसाददी
धला॥ ४८॥ शेचाळिसाव्यांतब्राह्मणवेषें॥ सेवाकेलीद्वारकाधीशें॥ मगलोटलियाद्वादशवरुषें॥ एकनाथासीश्रुतजाहलें
॥ ४९॥ साक्षातअवतारमारुतीचाजाण॥ रामदासपळालेपडद्याआडून॥ मगपंढरीसिरुक्मिणीरमण॥ रामरूपध
रूनिभेटले॥ १५०॥ अठ्ठेचाळिसाव्यांतकथाऐसी॥ वैराग्यजाहलेंतुकयासी॥ कीर्तनांतयेऊनिहर्षीकेशी॥ परचक्रा
सीवारिलें॥ ५१॥ एकुणपन्नासाव्यांतऐशीरीर्ती॥ उपदेशकेलाकांतप्रती॥ गृहलुटविलेंविप्रांहार्ती॥ उदारवृत्तिध
रियेली॥ ५२॥ पन्नासाव्यांतकथासुरस॥ तुकयाचेपाठीवरमारिलाऊंस॥ मगपत्रलिहूनिकरुणारस॥ पंढरीसपाठ
विलें॥ ५३॥ निंबराजाच्याखांद्यावरी॥ कीर्तनांतउभेराहिलेहरी॥ एकावन्नाव्यांतऐशियापरी॥ कथाचतुरींजाणिजे
॥ ५४॥ हिलालस्लागूनिमंडपजळत॥ शेखमहंमदासिजाहलेंश्रुत॥ कोरड्याचवह्याऊदकांत॥ बावन्नाव्यांतनिघाल्या
॥ ५५॥ बोधल्यानेंलुटविलेंशेत॥ सारादेतपंढरीनाथ॥ थोंठ्यातांदांसिकणसेंबहुत॥ त्रेपन्नाव्यांतआणिलीं कीं॥ ५६॥
कीर्तनांतउठविलेंप्रेत॥ हांसीकुणबीणजाहलीगुप्त॥ अंत्यजासकेलेंफजीत॥ चौपन्नाव्यांतकथाहे॥ ५७॥ पंचावन्नाव्यां
तचरित्रेंच्यार॥ श्रोतींऐकिलींअसतीलसादर॥ गणेशनाथेंतरुवेर॥ उपदेशिलानिजकृपें॥ ५८॥ आणिकेशवस्वामी
च्याकीर्तनांत॥ बचनागखातांवांचलेभक्त॥ गोमाईसिउतरूनिपंढरीनाथ॥ पानगेप्रीतीनेंखादले॥ ५९॥ लतिब
शाहाचाभावदेखिला॥ चित्रानेंतत्काळविडाघेतला॥ यवनराजाचरणींलागला॥ मगमंदिरासिगेलासत्वर॥ १६०॥
छप्पन्नाव्यांतकथाअपूर्व॥ संतोबापवाराचादेखोनिभाव॥ कूर्महोऊनिदेवाधिदेव॥ यात्रासर्वउतरिली॥ ६१॥ निळो
बाचेलग्नींसाहित्यकेलें॥ बेदरींमारुतीनेंमसंदीसपाडिलें॥ उद्धवचिद्घनासिसाहित्यकेलें॥ छप्पन्नाव्यांतवर्तलेंचरित्र

---

१ महार. २ वृक्ष. ३ बचनाग या नांमें बिष.

हें ॥ ६२ ॥ विसोबासराफभाविकपूर्ण ॥ त्याचेंसत्तावन्नाव्यांतवारिलेंऋण ॥ हें तोंप्रस्तुतअनुसंधान ॥ केलेंश्रवणसक ळिकीं ॥ ६३ ॥ हेछप्पन्नदेशींचेराजहंस ॥ भक्तकथाघेऊनिमुक्ताघोंस ॥ सत्तावन्नावासरोवरमानस ॥ एथेंक्रीडावया सएकवटले ॥ ६४ ॥ प्रपंचआणिपरमार्थदोनी ॥ एकवटलेंहोतेंपयपाणी ॥ मगविवेकचंचूसिखोऊनी ॥ क्षीरचिनिव डूनघेतलें ॥ ६५ ॥ हींछप्पन्नरत्नेंअमूल्यचोखट ॥ सत्तावन्नावासुवर्णतगट ॥ कोंदणींबैसवूनिएकवट ॥ वैकुंठपीठपूजि ला ॥ ६६ ॥ निष्कामभक्तआणिप्रेमळ ॥ ह्यातुळसीमंजिऱ्याकोमळ ॥ यांचीगुंफोनियांमाळ ॥ दीनदयाळपूजिला ॥ ॥ ६७ ॥ कींछप्पन्नदेशींचेपाषाणनिर्मळ ॥ सत्तावन्नावाउत्तमस्थळ ॥ तेथेंरचोनियांचेंदेऊळ ॥ आंतघननीळबैसविला ॥ ॥ ६८ ॥ आणिकसंतवैष्णवमहंत ॥ भक्तप्रकटजाहलेबहुत ॥ तेमोकळींसुमनेंघेऊनिनिश्चित ॥ पुष्पांजळीअर्पावी ॥ ॥ ६९ ॥ भर्तृहरीजालंधर ॥ सदानंदशंकराचार्य ॥ गोपीचंदराजाउदार ॥ नरसिंहनागरविवेकी ॥ १७० ॥ हिरासिं गवाणीगुर्जर ॥ मलुकदासगंगकवीश्वर ॥ चर्पटीचौरंगीभक्तथोर ॥ शार्ङ्गधरवशकेला ॥ ७१ ॥ धनाजाटबाजीदखा न ॥ बाबाआणिनानकसदन ॥ नरसिंहभारतीनारायण ॥ अच्युताश्रमविवेकी ॥ ७२ ॥ हळसीअवघडमुधयाभक्त ॥ मुकुंदराजजगविख्यात ॥ जेणेंविवेकसिंधुअध्यात्मग्रंथ ॥ निजबुद्धीरचियेला ॥ ७३ ॥ कृष्णंभटयाज्ञवल्की ॥ कृष्णदा समुद्गलविवेकी ॥ कान्हयाहरिदासनामापाठकी ॥ हेप्रसिद्धलोकींनिजभक्त ॥ ७४ ॥ लोलिंबराजचांदबोधला ॥ शे खफरीदप्रसिद्धभला ॥ शेखहुसेनसलांगळा ॥ हेभक्तदेवालाआवडती ॥ ७५ ॥ नरहरिजयराममालोपंत ॥ नरसिंह सरस्वतीप्रेमळभक्त ॥ महामुद्गलभटजगविख्यात ॥ जानकीकांतवशकेला ॥ ७६ ॥ एकलिंगमैराळसिद्ध ॥ सुमतिक मळाकुरप्रसिद्ध ॥ रेणुकानंदआनंदकंद ॥ लीलाअगाधजयाची ॥ ७७ ॥ श्रीपतिआणिदासोपंत ॥ माधवदासजग

१ देणें, कर्ज. २ दूध. ३ क्षिरारूप. ४ कोंदण, आच्छादन. ५ अधिक. ६ राम.

विख्यात ॥ प्र्‍हादबडवेबापूजीपंत ॥ हेदेवासिबहुतआवडते ॥ ७८ ॥ गोसांवीनंदनस्वामीवामन ॥ गिरिबाईचि
न्मयनंदन ॥ वस्वलिंगाचेंऐकूनिकीर्तन ॥ जगज्जीवनसंतोषे ॥ ७९ ॥ अंतोबाआणिभगवंतभट ॥ विठ्ठलपुरंदरएकनिष्ठ
मैनावतीचीदेखोनिनिकट ॥ वैकुंठपीठसंतोषले ॥ १८० ॥ लालुनखोजीपरमानंद ॥ दादुपिंजारीपूर्णानंद ॥ बहिणाबा
ईचाप्रेमछंद ॥ नाचेगोविंदकीर्तनीं ॥ ८१ ॥ हरिविजयरामविजयसार ॥ पांडवप्रतापग्रंथथोर ॥ तोश्रीधरस्वामीनाझ
रेकर ॥ पंढरपुरनिवासी ॥ ८२ ॥ शिवरामगोसांवीपैठणकर ॥ नारायणनिंबयाचाकुमर ॥ त्याचाऐकोनिकीर्तनग
जर ॥ रुक्मिणीवरसंतोषे ॥ ८३ ॥ तुकयाचाबंधूकान्हयाजाण ॥ धाकुटाकुमरनारायण ॥ जेणेंकांतेचात्यागकरून ॥ केलें
गमनद्वारकेसी ॥ ८४ ॥ बोधल्याचानातुभगवंतबावा ॥ तैसाचिपैठणकरन्होबाबावा ॥ ज्याचाकीर्तनींअखंडहेवा ॥ गाइ
लेंदेवानिजप्रेमें ॥ ८५ ॥ आनंदतनयप्रसिद्धजनी ॥ रघुपतिशेषपूर्णज्ञानी ॥ जयाचेंकीर्तनऐकोनिकानीं ॥ झालेज्ञानी
अतिमूढ ॥ ८६ ॥ शेंदुरवादियांतसाचार ॥ मध्वमुनीश्वरभक्तथोर ॥ जोपद्यरचनींअतिचतुर ॥ शार्ङ्गधरवशकेला ॥
॥ ८७ ॥ शंकरजीबावाशिउरकर ॥ ज्याचाकीर्तनगजरथोर ॥ सिद्धांतज्ञानीअतिउदार ॥ पाखांडीयांवरपंचानन ॥
॥ ८८ ॥ अमृतरायभक्तप्रेमळ ॥ ज्याचेंकवित्वअतिरसाळ ॥ श्रवणींऐकतीनिंदकखळ ॥ द्रवतीतत्काळनिजप्रेमें ॥ ८९ ॥
ऐसेसंतप्रेमळजनीं ॥ जेईश्वरकृपेचेवरदानी ॥ तयांचियानिजचरणीं ॥ नमनमाझेंसाष्टांग ॥ १९० ॥ मोरेश्वरबावाताां
बवेकर ॥ जोभागवतधर्मीअतितत्पर ॥ त्याचेचरणींवारंवार ॥ नमनमाझेंसाष्टांग ॥ ९१ ॥ जेएकानिष्ठाधरूनिअंतरीं ॥ झा
लेपंढरीचेवारकरी ॥ त्यांप्रेमळभक्तांचेचरणावरी ॥ नमनमाझेंसाष्टांग ॥ ९२ ॥ धरूनिसप्रेमउल्हास ॥ ज्यांणींपंढरीसि
केलावास ॥ त्याक्षेत्रवासियांनिजभक्तांस ॥ नमनमाझेंसाष्टांग ॥ ९३ ॥ आणिकहीपुढेवैष्णवभक्त ॥ गुप्तप्रकटहोणारबहु

१ स्त्री. २ सदोदित. ३ शेंदुर नामें गांव. ४ गोड. ५ दुष्ट. ६ मनांमध्यें.

त ॥ त्यांचेचरणींभावार्थ ॥ माझाप्रणिपातसाष्टांग ॥ १४ ॥ असंख्यईश्वराच्याविभूती ॥ गणतीघेतांनपुरेमती ॥ जेवींपर्ज
न्याच्याधारापडतांक्षितीं ॥ त्यानमोजवतीसर्वथा ॥ १५ ॥ पृथ्वीवरीअंकुरउडलेदेख ॥ त्यांचासर्वथानव्हेचिलेख ॥
कींसागरींच्यालहरीअनेक ॥ धरावालेखकोठवरी ॥ १६ ॥ जोलीलानाटकीरुक्मिणीकांत ॥ आपणचिजाहलादेवभ
क्त ॥ तयांसीचपाहतांसकळसंत ॥ आलेदृष्टीअनायासें ॥ १७ ॥ घेतांसागराचेंदर्शन ॥ सकळसरितांचेंदेखिलेंजीव
न ॥ कांभास्करासिकरितांनमन ॥ सकलकिरणदेखिले ॥ १८ ॥ अश्वत्थासिप्रदक्षिणाकरितांदेखा ॥ तरीत्यांतच
आल्यासकळशाखा ॥ तेवींनिजभक्तांवैकुंठनायका ॥ द्वैतसर्वथानसेकीं ॥ १९ ॥ गोडीआणिसाकरजैसी ॥ निवडि
तांनयेचतुरासी ॥ तेवींनिजभक्तआणिभीमातीरवासी ॥ एकविमानसींजाणिजे ॥ २०० ॥ यादोहींचेकृपेंकरून ॥ भ
क्तविजयजाहलानिर्माण ॥ श्रोतयांचेमनोरथपूर्ण ॥ श्रवणमात्रेंहोतीलकीं ॥ २०१ ॥ जेभक्तचरित्रेंअखंडगात ॥ त
यांसिज्ञानहोईलअद्भुत ॥ कृपाकरूनिपंढरीनाथ ॥ भेटेलनिश्चितत्यालागीं ॥ २ ॥ ग्रंथसंग्रहकरितांघरीं ॥ तरीविघ्नें
नयेतीत्याचेमंदिरीं ॥ भोंवतेंसुदर्शनघिरटीकरी ॥ निश्चयअंतरींअसोंद्या ॥ ३ ॥ याग्रंथामाजीहेंचिकथन ॥ कींभ
क्तांसिपावलाजगज्जीवन ॥ ह्मणोनिश्रोतयांवक्तयांकारण ॥ रुक्मिणीरमणरक्षिता ॥ ४ ॥ कलियुगींचींचरित्रेंऐको
नी ॥ सामान्यनह्मणावींविचक्षणीं ॥ कृतत्रेताद्वापरालागूनी ॥ थोरथोरमुनीगातील ॥ ५ ॥ कलीचाप्रारंभहोतांचित
रित ॥ सुरवरआनंदलेबहुत ॥ कींआटघटिकाकरितांएकाग्रचित्त ॥ वैकुंठनाथभेटेलकीं ॥ ६ ॥ तंवनारदमुनीनेंकौ
तुककेलें ॥ जिव्हाशिश्नहातींधरिलें ॥ सकळदेवांसिआश्चर्यवाटलें ॥ मगपुसतेजाहलेतयासी ॥ ७ ॥ यावरीबोलेब्र ॥ ७
ह्मसुत ॥ हेदोनीनावरत्तीकलियुगांत ॥ सुरवरींऐकतांहेमात ॥ चिंताक्रांतमानसीं ॥ ८ ॥ मगनारदसांगेतयांप्रती ॥

१ उरस्थळ, मस्तक, नेत्र, वाणी, मन, पाद, हस्त, जानु, याप्रकारें साष्टांग नमस्कार होतो. २ अवतार. ३ पृथ्वीवर. ४ लाटा. ५ नद्यांचें उदक. ६ सूर्यास. ७ पिंपळास ८ पांडुरंग.

कलियुगींवैष्णवभक्तजेहोती ॥ त्यांचींचरित्रेंजेऐकती ॥ त्यांसिवैकुंठपतीभेटेल ॥ ९ ॥ ऐसेंबोलतांब्रह्मनंदन ॥ विबुध आनंदलेसंपूर्ण ॥ ह्मणतीहेंस्वल्पसाधन ॥ आह्मांकारणमानलें ॥ २१० ॥ ह्मणोनिमहर्षिआणिइंद्रादिकांसी ॥ भक्तचरित्रेंपावनतयांसी ॥ विचक्षणींवचनेंऐकूनिऐसीं ॥ विकल्पमानसींनधरावा ॥ ११ ॥ जैसीआज्ञाकेलीरुक्मिणीवरें ॥ तितकींचग्रंथींलिहिलींअक्षरें ॥ जैसावाजविणारफुंकितोवारे ॥ तैसींचवाजंतरेंवाजती ॥ १२ ॥ क्षेत्रांतबीजपेरिलेंजाण ॥ अंकुरयेणेंजीवनाधीन ॥ कींजळमंटपीयाचेंनाचणेंजाण ॥ कळसूत्राधीनअसेकीं ॥ १३ ॥ तेवींभक्तविजयग्रंथीं ॥ बुद्धीचादाताश्रीरुक्मिणीपती ॥ तेणेंउजळोनियांमाझीमती ॥ ग्रंथनिजयुक्तींलिहविला ॥ १४ ॥ शकेसोळाशेंचवऱ्यायशी ॥ चित्रभानुनामसंवत्सरासी ॥ वैशाखवद्यद्वादशीसी ॥ ग्रंथसिद्धीसीपावविला ॥ १५ ॥ प्रवरेपासूनिदक्षिणेस ॥ ताहाराबादगांवपांचकोश ॥ भक्तविजयअतिसुरस ॥ झालाअसेतेठायीं ॥ १६ ॥ शेवटीलविनवणीआतां ॥ माझीऐकेगापंढरीनाथा ॥ तूंचिश्रोताआणिवक्ता ॥ ग्रंथरक्षितानिजकृपें ॥ १७ ॥ तूंअखिलअविनाशजगद्गुरू मायातीतसर्वेश्वरू ॥ निराधारीयांसिआधारू ॥ करिसीभवपारूदासांसी ॥ १८ ॥ भक्तांनींजैसीघेतलीआळ ॥ तीतूंपुरविसीतत्काळ ॥ त्यांचेंप्रेमदेखोनिनिर्मळ ॥ हृदयकमळींवसविले ॥ १९ ॥ कोणासिदीधलेंआत्मज्ञान ॥ कोणीमागीतलेंसायुज्यसदन ॥ माझेंहेंचिइच्छितसेमन ॥ जेगुणवर्णीनहरीचे ॥ २२० ॥ कोणीबैसलेवज्रासनीं ॥ कोणीबैसलेवैकुंठभुवनीं ॥ मीनिजदासांचेकीर्तनीं ॥ झालोंरतसप्रेमें ॥ २१ ॥ अविटआवडीधरूनिचित्तीं ॥ तुझियादासांचीवर्णिलीस्तुती ॥ हेंचिउचितमहीपती ॥ मागेनिजप्रीतींनिरंतर ॥ २२ ॥ स्वस्तिश्रीभक्तविजयग्रंथ ॥ ऐकतांतुष्टेलजगन्नाथ ॥ प्रेमळऐकाभाविकभक्त ॥ सप्तपंचाशत्तमाध्यायरसाळहा ॥ २२३ ॥ श्रीगोपालकृष्णार्पणमस्तु ॥ श्रीमजगदीश्वरार्पणमस्तु ॥ ॥ अध्याय ॥ ५७ ॥ ॥ ओव्या ॥ २२३ ॥ ॥ इतिश्रीभक्तविजयग्रंथः समाप्तः ॥

हा ग्रंथ मुंबईत मेसर्स गोपाळ नारायण आणि कंपनी यांच्याकारितां एशियाटीक छापखान्यांत रामचंद्र कृष्ण पिंगे वेररकर याणीं छापून प्रसिद्ध केला. मिति पौष शुद्ध १२ शनिवार, शके १८०४ ता. २० जानेवारी सन १८८३.

॥ २१० ॥ कींरासभेंब्रीदवांधोन ॥ नारदापुढेंमांडिलेंगायन ॥ कींमूषकटवकारून ॥ वासुकीधरूंआला ॥११॥ कीं
सज्ञानपंडितापुढें ॥ बोलावयाआलींमूढें ॥ कींजंबुकेंआपलेपवाडे ॥ व्याघ्रापुढेंदावीत ॥ १२ ॥ मजपुढेंकायआदित्य
॥४॥ म्हणऊननिंदाकरीखद्योतें ॥ मरणकाळींहोयसन्निपात ॥ तैसेंतुजजाहलेंरे ॥ १३ ॥ काळमृत्यूचीछायापडली ॥ मृत्युवे
ळजवळीआली ॥ ऐकोनिशिशुपाळतेवेळीं ॥ अधिकचिआवेशला ॥ १४ ॥ शस्त्रकाढूनवेगेंसीं ॥ म्हणेकृष्णाऊठरेंजुं
झमजसीं ॥ नपुंसकाकायबैसलासी ॥ लाजकैसीनुपजेतूतें ॥ १५ ॥ तुझेंरुसणेंसमजणेंदोन्ही ॥ मीशिशुपाळतृणप्रा
यमानी ॥ गोरक्षकातुजआझूनी ॥ लज्जाकांरेनवाटे ॥ १६ ॥ उपजानियांतुवांगोवळा ॥ वृष्णिकुळासीडागलावि
ला ॥ तुवांचोरूनिनेलीरुक्मिणीवेल्हाळा ॥ तेनवरीमाझीनिर्धारें ॥ १७ ॥ रुक्मिणीआधींअर्पिलीमातें ॥ म्यांमनींच
भोगिलेंतीतें ॥ मगतेप्राप्तजाहलीतूतें ॥ माझेंउच्छिष्टगुराखिया ॥ १८ ॥ जैसेंभोगिलेंवस्त्रबहुत ॥ तेंभाटासीदेतीभा
ग्यवंत ॥ तैसीरुक्मिणीम्यांभोगिलीनिश्चित ॥ तुजतेप्राप्तजाहली ॥ १९ ॥ पुष्पहारभोगूनटाकिला ॥ तोभणगेंजैसा
उचलूनिनेला ॥ कींरावणेंचोरूननेलीजनकबाळा ॥ तैसीरुक्मिणीतुवांनेली ॥१२०॥ शाल्वपवित्रतुजपरीस ॥ कदा
नातळेअंबेस ॥ नवरीजेनेभिलीआणिकास ॥ तेसर्वथानपर्णावी ॥ २१ ॥ ज्याचेनावेंजेंपात्रवाढिलें ॥ आणिकानेतांतें
उच्छिष्टजाहलें ॥ हेधर्माधर्मशास्त्रींबोलिले ॥ तुजनकळतीकर्मभ्रष्टा ॥ २२ ॥ श्रीकृष्णम्हणेरेदुर्जना ॥ महानिंदकादु
ष्टामळिना ॥ तूंअग्रपूजाइच्छितोसिहीना ॥ तरीआतांचियेईनिर्धारें ॥ २३ ॥ ऐसेंबोलानिर्क्षीराब्धिजारमण ॥ केलें
सुदर्शनाचेंस्मरण ॥ तंवअकस्मातयेऊन ॥ कृष्णहस्तकींसंचरलें ॥ २४ ॥ जैसाकल्पांतींचाआदित्य ॥ तैसेंसुदर्शन ॥९॥
धगधगीत ॥ शिशुपाळावरीसोडिलेंअकस्मात ॥ वैकुंठनाथेंतधवां ॥ २५ ॥ तात्काळशिशुपाळाचेंछेदिलेंशिर ॥ निरा

१ उंदीर. २ कोल्हा. ३ काजवा. ४ मेला. ५ क्षीरसमुद्राची कन्या लक्ष्मी तिचा पति श्रीकृष्ण. ६ सूर्य. ७ आकाश.

ऊपंथेंउडालेंसत्वर ॥ मुखेंगर्जनाकरीथोर ॥ म्यांयदुवीरजिंकिला ॥ २६ ॥ शिरमागुतेंउतरलें ॥ तेंश्रीकृष्णचरणाजव
ळीपडिलें ॥ अंतर्ज्योतीनिघालीतेवेळे ॥ कृष्णरूपींप्रवेशली ॥ २७ ॥ बाळसूर्यासारिखेंतेजअद्भुत ॥ ज्योतीश्रीकृष्ण
हृदयींप्रवेशत ॥ जैसेंलवणजळींविरत ॥ कींगगनांतनादजैसा ॥ २८ ॥ सांडूनजीवदशासंपूर्ण ॥ शिशुपाळजाहला
कृष्ण ॥ त्वंपदतत्पदींजायहरपोन ॥ तैसालीनजाहला ॥ २९ ॥ कींपूर्णजळींजळबिंदुपाडिला ॥ तोमाघारानाहींपरतला
तैसाशिशुपाळगोवळाजाहला ॥ नाहींउरलेंवेगळेंपण ॥ ३० ॥ हेवैकुंठींचेद्वारपाळ ॥ जयविजयनिर्मळ ॥ सनका
दिकींशापितांतात्काळ ॥ दैत्ययोनींतअवतरले ॥ ३१ ॥ हेचहिरण्याक्षहिरण्यकश्यपजाण ॥ तेचजाहलेरावणकुंभक
र्ण ॥ तेचहेशिशुपाळवक्रदंतपूर्ण ॥ कृष्णावतारींजन्मले ॥ ३२ ॥ परमभक्तशिशुपाळ ॥ बळेंचहरिरूपजाहलातात्का
ळ ॥ हातिंचीवस्तुअसडूननेतबाळ ॥ तैसेंचकेलेंयथार्थ ॥ ३३ ॥ तिसरेजन्मींनिश्चिती ॥ कृष्णेंदीधलीअक्षयमुक्ती ॥
हृदयींठेविलीअंतर्ज्योती ॥ महाभक्तह्मणोनी ॥ ३४ ॥ असोजाहलाजयजयकार ॥ पुष्पवृष्टीवर्षतीसंभार ॥ दुष्टपळा
लेसमग्र ॥ वक्रदंतासहितपैं ॥ ३५ ॥ कौरवअंतरींचिंताक्रांत ॥ ह्मणतीआमुचेंउणेंपडिलेंबहुत ॥ एकआनंदेंटाळिया
वाजवित ॥ बरेंजाहलेंह्मणोनियां ॥ ३६ ॥ ऐसाशिशुपाळपावलानिजधाम ॥ पार्थाप्रतिनिरोपीधर्म ॥ ह्मणेयाचेंप्रेत
कराभस्म ॥ जातवेदामाझारी ॥ ३७ ॥ मगशिशुपाळाचेंराज्यहोतें ॥ तेंदिधलेंत्याच्यापुत्रातें ॥ धर्मराजेंसमस्तरायां
तें ॥ वस्त्रेंअलंकारसमर्पिले ॥ ३८ ॥ ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्र ॥ अवघियांसीगौरवीयुधिष्ठिर ॥ पूजामानपावोनसमग्र
गेलेनगरांआपुलाले ॥ ३९ ॥ अवभृथस्नानकेलें ॥ तेथेंसकळलोकसुस्नातजाहले ॥ सहपरिवारेंसींतेवेळे ॥ श्रीकृष्ण
निघालेद्वारकेसीं ॥ १४० ॥ धर्मासींह्मणेकमलोद्भवपिता ॥ आह्मांसनिरोपदेईआतां ॥ धर्मेंचरणींठेविलामाथा ॥
कंठजाहलासद्गदित ॥ ४१ ॥ धर्मराजप्रेमेंस्फुंदत ॥ जाएसेंनह्मणेचिसत्य ॥ पुढतीलौकरीयावेंह्मणत ॥ धन्यभक्तध

मेराज ॥ ४२ ॥ भीमअर्जुननकुळसहदेव ॥ तयांसींपुसतवासुदेव ॥ कुंतीद्रौपदीसुभद्रेप्रतिमाधव ॥ स्नेहआज्ञामाग
तसे ॥ ४३ ॥ तंवतेह्मणतीश्रीपती ॥ जेथेंतुझेपदउमटती ॥ तेथेंआमुचेंमस्तकअसोनिश्चिती ॥ ऐसेंचवरीरमावरा ॥

॥ ४४ ॥ हृदयांतूनअमुच्याश्रीपती ॥ परताजाऊंनकोनिश्चिती ॥ ज्याज्याभूताकृतीभासती ॥ तुझेंस्वरूपभासोतें ॥
॥ ४५ ॥ श्रीकृष्णासींबोळउनी ॥ पांडवआलेपरतोनिसदनीं ॥ जागृतिसुषुप्तिस्वप्नीं ॥ कृष्णचिंतनींसादर ॥ ४६ ॥
राजसूययज्ञजाहलासमाप्त ॥ द्वारकेसपावलावैकुंठनाथ ॥ तोंपौंड्रकआणिवक्रदंत ॥ वेढाघालितीनगरातें ॥ ४७ ॥
शिवेंदीधलेंवरदविमान ॥ त्यांतवक्रदंतसेनेसहितबैसून ॥ द्वारकेवरीयेऊन ॥ युद्धकरितीशस्त्रास्त्रीं ॥ ४८ ॥ तोंइतुकि
यांतपावलाजगज्जीवन ॥ तात्काळसोडिलेंसुदर्शन ॥ वक्रदंताचेंशिरछेदून ॥ आकाशपंथेंउडविलें ॥ ४९ ॥ पौंड्रकसे
नासमवेत ॥ हरीनेंसंहारिलातेथ ॥ ऐसाप्रतापकरूनअद्भुत ॥ कृष्णेंशस्त्रेंठेविलीं ॥ १५० ॥ मुख्यवधिलेशिशुपाळव
क्रदंत ॥ इतुकेनआमुचेंमनोगत ॥ अवतारकृत्यजाहलेंयथार्थ ॥ यादोघांसींमारितां ॥ ५१ ॥ आह्मासींशस्त्रधरणेंना
हींआतां ॥ उरलेतेदैत्यतत्वतां ॥ तेसारथ्यकरूनिपार्था ॥ त्याहातींपुढेंवधावे ॥ ५२ ॥ जन्मेजयासींसांगेवैशंपायन ॥
धन्यधन्यअवतारश्रीकृष्ण ॥ गोकुळींअपारदैत्यमारून ॥ कंसवधिलामथुरेसीं ॥ ५३ ॥ जरासंधसतरावेळत्रासिला
द्वारकावसविलीअवलीला ॥ नरकासुरमारूनसहस्त्रसोळा ॥ गोपीआणिल्यावरासीं ॥ ५४ ॥ आतांश्रोतींव्हावेंसाव
चित्त ॥ पुढेंछत्तिसावाअध्यायगोडबहुत ॥ छत्तिसाव्यापासूनहरिविजयग्रंथ ॥ संपूर्णयथार्थजाहला ॥ ५५ ॥ जैसामु
गुटावरीलमणी ॥ तैसाछत्तिसावाऐकाश्रवणीं ॥ हरिविजयहिरियाचीखाणी ॥ सज्जनजोहरीयेर्थींच ॥ ५६ ॥ श्रीधर ॥ ५ ॥
वरदाजगन्निवासा ॥ ब्रह्मानंदापंढरीशा ॥ भक्तमानसराजहंसा ॥ पुराणपुरुषाजगद्वंद्या ॥ ५७ ॥ इतिश्रीहरिविजय
ग्रंथ ॥ संमतहरिवंशभागवत ॥ चतुरपरिसोतपंडित ॥ पस्तिसावाअध्यायगोडहा ॥ १५८ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

श्रीगणेशायनमः ॥ ॥ ओंनमोसद्गुरुअवधूता ॥ परब्रह्माअपरमिता ॥ पुराणपुरुषाअव्यक्ता ॥ मायातीताअगम्या
॥ १॥ आदिपुरुषाविश्वंभरा ॥ अवयवरहितादिगंबरा ॥ सदानंदरूपानिर्विकारा ॥ आत्मयारामाकृपानिधी ॥२॥ अ
मलरूपापरमगंभीरा ॥ ब्रह्मानंदापरात्परा ॥ सहजानंदाअगोचरा ॥ कल्याणधामाजगद्गुरू ॥ ३ ॥ पूर्णानंदाअपरि
मिता ॥ दत्तात्रयषड्विकाररहिता ॥ ब्रह्मानंदाज्ञानभरिता ॥ भीमातीरविलासिया ॥ ४ ॥ रुक्मिणीहृदयाब्जमधुकरा
दाक्षायणीवरप्रियामनोहरा ॥ पांडवकैवारियादीनोद्धारा ॥ शिशुपाळांतकाश्रीपती ॥ ५ ॥ पंचत्रिंशतिअध्यायींकथा
परिकर ॥ छेदूनशिशुपाळाचेंशिर ॥ विजयीजाहलाश्रीकरधर ॥ धर्मरक्षकपरमात्मा ॥६॥ आतांछत्तिसावाबहुसुरस
हरिविजयाचापूर्णकलश ॥ जोभोजनाच्याशेवटींगोडग्रास ॥ तैसाविशेषछत्तिसावा ॥ ७ ॥ छत्तिसावेअध्यायग्रंथ
आघवा ॥ परीमुगुटमणीछत्तिसावा ॥ तोभक्तजनींपरिसावा ॥ प्रेमादरेंकरूनियां ॥ ८ ॥ द्वारकेसिनांदतांरुक्मिणी
रमण ॥ तोंपुढेंआलेंसूर्यग्रहण ॥ कुरुक्षेत्रासींजावेंम्हणोन ॥ निश्चयकेलाश्रीवल्लभें ॥ ९ ॥ तोंयापूर्वींचबळिभद्र ॥ गो
कुळासींपाठवीयादवेंद्र ॥ जोमहाबळियाभोगींद्र ॥ धरांधरअवतरला ॥ १० ॥ गोकुळासींजाऊनिरोहिणीसुत ॥ य
शोदानंदगौळीसमस्त ॥ तयांसींभेटलारेवतीप्राणनाथ ॥ सौख्यअद्भुतसमस्तां ॥ ११ ॥ चारमासपर्यंत ॥ बळिभद्र
राहिलास्वस्थ ॥ श्रीकृष्णप्रतापअद्भुत ॥ जाहलातासमस्तसांगीतला ॥१२॥ मथुरेहूनिगेलाकृष्णनाथ ॥ कोणकोणमा
रिलेदैत्य ॥ कैशाअष्टनायिकाझाल्याप्राप्त ॥ आणिसोळासहस्त्रकामिनी ॥ १३ ॥ तेचरित्रमुखींहून ॥ सांगेबळिभद्रआ
पण ॥ कैसाजाहलाराजसूययज्ञ ॥ कैसाशिशुपाळमारिला ॥१४॥ तीचरित्रेंऐकतांश्रवणीं ॥ तटस्थहोतीगौळीगौळणी
म्हणतीऐसापुराणपुरुषचक्रपाणी ॥ कैंआम्हांलागुनभेटेल ॥ १५ ॥ बळिभद्रनित्यवनासींजाय ॥ विलोकीहरीचेंक्रीडा

१ दृष्टीस न पडणारा. २ अतिक्रमण करणारा. ३ प्राप्त होण्यास कठीण. ४ सहा विकारांपासून मुक्त. ५ समुद्र. ६ शेष. ७ पृथ्वी धारण करणारा शेषावतार बलराम.

॥ १ ॥ ठाय ॥ कुंजवनींक्रीडाकेलीपाहे ॥ गडियांसमवेतहलधरें ॥ १६ ॥ तोंमाध्यान्हासआलाचंडकिरण ॥ जळक्रीडाकरूं
इच्छीसंकर्षण ॥ यमुनादूरहोतीतेथुन ॥ तीसरेवतीरमणबोलावी ॥ १७ ॥ ह्मणेआलीकडेयेईसूर्यनंदिनी ॥ तोंतेवाहे
निजच्छंदेंकरूनी ॥ बळिरामक्षोभलातेक्षणीं ॥ नांगरघालूनिओढिली ॥ १८ ॥ ओघमुरडोनिसगळा ॥ आपणाकडे
रामेंआणिला ॥ गर्गनींदेवपाहतीडोळा ॥ नवलगोपाळांवाटतसे ॥ १९ ॥ जळक्रीडाकरूनिबळिभद्र ॥ गोकुळास
आलासत्वर ॥ चारमासझालियाहलधर ॥ जाताजाहलाद्वारकेसीं ॥ २० ॥ संपूर्णगोकुळींचेंवर्तमान ॥ कृष्णासींसां
गेरेवतीरमण ॥ तोंपुढेंग्रहणयात्रेसजगज्जीवन ॥ निघताजाहलाकुरुक्षेत्रासीं ॥ २१ ॥ निघालेछप्पन्नकोटीयादव ॥ उग्र
सेनबळिभद्रवसुदेव ॥ प्रद्युम्नअनिरुद्धअक्रूरउद्धव ॥ सांबभानुमंतनिघाले ॥ २२ ॥ रुक्मिणीसहितअष्टनायिका ॥
निघाल्यासोळासहस्त्रगोपिका ॥ चातुरंगदळदेखा ॥ सिद्धजाहलेंतेकाळीं ॥ २३ ॥ लागलेंवाद्यांचेगजर ॥ असंभाव्य
चालिलादळभार ॥ कृष्णनायिकासमग्र ॥ सुखासनींआरूढल्या ॥ २४ ॥ रेवतीदेवकीरोहिणी ॥ सत्यभामाकालिंदीरु
क्मिणी ॥ ज्यांचियावहनापुढेंकनकवेत्रपाणी ॥ लक्षावधीधांवती ॥ २५ ॥ वळीनेंचालिलेपर्वत ॥ तैसेगजभारयेतीडो
लत ॥ त्यांवरीयादवबैसलेरणपंडित ॥ कृतांताहिभीतजयांतें ॥ २६ ॥ पुढेंचालतीपायभार ॥ मागेंतुरंगचालतीसत्व
र ॥ त्यांचेपाठिमागेंकुंजर ॥ किंकाटकरितजाताती ॥ २७ ॥ श्रीकृष्णाचेभद्रजाती ॥ शुंडादंडऊर्ध्वकरितो ॥ वाटेआका
शकवळेंपाहती ॥ हिरेदांतींजडियेले ॥ २८ ॥ त्यांचेपाठिमागेंरथांचेभार ॥ निजरथींविराजेयादवेंद्र ॥ जोकोटिअनंगां
हूनसुंदर ॥ लावण्यसागरश्रीहरी ॥ २९ ॥ देशोदेशींचेनृपती ॥ निजभारेंशींसवेंचालती ॥ दाटीजाहलीहरिभोंवती
वारीनसेदर्शना ॥ ३० ॥ राजयांचेमुगुटरत्नजडित ॥ त्यांसहितकृष्णपदींनमित ॥ एकासएकमुगुटआदळत ॥ रत्नें ॥ १ ॥

१ वेलीचें घर. २ बलराम. ३ सूर्य. ४ यमुना. ५ आपले इच्छेनें. ६ आकाश. ७ कालीकेर. ८ हत्ति, घोडे, रथ, पायदळ. ९ पालखी. १० महालदार.

विखुरतीसभोंवतीं ॥ ३१ ॥ जैसासौदामिनीचाएकमेळ ॥ तैसेमुगुटदिसतीतेजाळ ॥ पहावयालागींघननीळ ॥ मंडप
घसणीहोतसे ॥ ३२ ॥ निजभारेंसींकौरवपांडव ॥ तेहीयेतेजाहलेसर्व ॥ भीष्मद्रोणभक्तराव ॥ विदुरहीपातला ॥३३॥
तोंइंद्रादिदेवतेक्षणी ॥ पाहोंइच्छितीचक्रपाणी ॥ तोंहरिभोंवतीनृपांचीदाटणी ॥ वारीदर्शनानव्हेची ॥ ३४ ॥ पहावया
हरिवदनचंद्र ॥ सर्वांचेनेत्रजाहलेचकोर ॥ योगीतापसीमुनीश्वर ॥ तेहीमुरहरपाहोंयेती ॥ ३५ ॥ असोइतुक्यांसम
वेतमुरारी ॥ येऊनउतरलाकुरुक्षेत्रीं ॥ शिबिरेंउभींकेलींतअवसरीं ॥ सोळासहस्त्रप्रथक्प्रथक् ॥ ३६ ॥ पुढेंलक्षूनिजो
न्हवीतीर ॥ निजभारेंउतरलेनृपवर ॥ तोंपूर्वीचश्रीकृष्णेंदूतसत्वर ॥ गोकुळासींधाडिलाहोता ॥३७॥ यशोदानंदगो
पिकागौळी ॥ यात्रेसपातलेतयेवेळीं ॥ बाळपणीचेसखेसकळी ॥ येतेजाहलेहरिदर्शना ॥ ३८ ॥ असंख्यगौळीआ
नंदेंकरून ॥ निघालेगोरसकावडीभरून ॥ पुढेंगोपाळपांवेघेउन ॥ आनंदेंकरूननाचती ॥ ३९ ॥ मृदंगटाळचुमरी
याई ॥ मोहऱ्याघुमऱ्यावाजेसनई ॥ हरीचीबाळलीलागातीनवलाई ॥ येतीलववलाहींगोपाळ ॥४०॥ चित्रविचित्रघोंग
डी ॥ पांघुरलेकृष्णाचेगडी ॥ एकनाचतीकडोविकडी ॥ हांसतीघडिघडीस्वानंदें ॥४१॥ श्रीकृष्णासींजाणवितीदूत ॥ कीं
गोकुळवासीआलेसमस्त ॥ श्रीनिवासझालाआनंदभरित ॥ वेगेंसांगतरुक्मिणीसीं ॥ ४२ ॥ माझींमातापितृव्येंदोन्ही
बाळमित्रआलेगोकुळींहूनी ॥ मजतेआवडतेबहुतरुक्मिणी ॥ बळिरामाहूनिअधिक ॥४३॥ रुक्मिणीसहितकृष्णात्रि
यासमग्र ॥ सिद्धजाहल्यापाहावयासर्व ॥ गौळियांमींयादवेंद्र ॥ कैसाभेटतोह्मणउनी ॥४४॥ तोंलक्षानुलक्षगाडे ॥ गौ
ळियांचेधांवतीवेगाढे ॥ वरीगोपिकाबैसल्यानिवाडे ॥ हरिलीलागातयेती ॥ ४५॥ तोंहरीचेसंवगडेसमग्र ॥ त्यांपुढेंआ
लेगोपिकांचेभार ॥ त्यांसन्मुखजाहलायादवेंद्र ॥ हरिनायकासमग्रपाहती ॥४६॥ ववववीतदैदीप्यमान ॥ गोपानींदेखि

१ वीज. २ राजे. ३ मुख. ४ हुंबु. ५ गौळी. ६ मुरली. ७ सत्वर. ८ यादवांमध्यें इंद्र ह्मणजे श्रेष्ठ तो यादवेंद्र ( श्रीकृष्ण ) हें नाव. ९ फार शोभतारा.

रुनी ॥ गोपाळह्मणतीचक्रपाणी ॥ तुझीकरणीकळलीआह्मां ॥ ४८ ॥ तुझेबाळपणीहूनप्रकृती ॥ आह्मांसठावकीच ॥ ३६ ॥
॥ २ ॥ जगत्पती ॥ आमुचींमनेंचोरूनिनिश्चिती ॥ घेऊनिश्रीपतिगेलासिपैं ॥ ४९ ॥ तूंपरमनाटकीचित्तचोर ॥ तुझाविश्वास
नाहींअणुमात्र ॥ तुजभाग्यआलेंथोर ॥ बाळमित्रविसरलासी ॥ ५० ॥ आमुच्यासंगतीनेजगज्जीवना ॥ गाईराखि
ल्यातुवांमनमोहना ॥ तूंयशोदेचातान्हा ॥ आह्मीकान्हाह्मणऊनबाहूं ॥ ५१ ॥ गाईराखितांहृषीकेशी ॥ तूंआह्मां
सांगातेंजेविसी ॥ आमुच्याशिदोऱ्याठकऊनखासी ॥ नलाजसीतोचिकीर्तूं ॥ ५२ ॥ हुतुतूहमामाहुमली ॥ आह्मांसीं
घालिसीवनमाळी ॥ तुजबुक्यावरीसकळीं ॥ डाईलागलियामारूंगडचा ॥ ५३ ॥ कृष्णातूंमोठाचोरहोसी ॥ तुजमाये
नेबांधिलेंउखळेसीं ॥ तेव्हांउद्धरिलेंयमळार्जुनदोघांसीं ॥ आठवनेंकींहृषीकेशा ॥५४॥ कृष्णातुजभाग्यआलेंथोर ॥ ये
व्हवीतूंनंदाचाकिशोर ॥ तुझ्यागोकुळींच्याखोडीसमग्र ॥ नवर्णवतीशेषातें ॥ ५५ ॥ वांसुरेंचारितांगोविंदा ॥ बळल्या
नदेसीतूंकदा ॥ मगतुजमारूंआह्मीमुकुंदा ॥ तेंतुजआठवतेंकीं ॥ ५६॥ आमुच्याशिदोऱ्याएकत्रकरुनी ॥ कालावां
टिसीतूंचक्रपाणी ॥ तेंतूंअंबिलताकघटघटोनी ॥ पीतहोतासीगोपाळा ॥ ५७ ॥ आतांबहुतजाहलासुकुमार ॥ तें
विसरलासतूंसमग्र ॥ अरेतूंपरमहोसीनिष्ठुर ॥ मायाअणुमात्रनाहींतूतें ॥ ५८ ॥ तैंतुझेआंगासिमाखेशेण ॥ आतांच
र्चिलाउत्तमचंदन ॥ तेव्हांधांवसीघोंगडीपांघरुन ॥ पीतवसनआतांझळके ॥ ५९ ॥ तैंमयूरपिच्छेंशिरींशोभत ॥ आ
तांरत्नकिरीटविराजत ॥ तैंगुंजांचेहारडोलत ॥ आतांकौस्तुभपदकेंझळकती ॥६०॥ तेंतूंविसरलासिगोपाळा ॥ आतां ॥ २ ॥
भाग्यआलेंघननीळा ॥ एकतांकृष्णनायकावेळोवेळा ॥ हांसतोरुक्मिणीसहितपैं ॥ ६१ ॥ एकगोपाळह्मणेहृषीकेशी

१ स्वभाव. २ बालक. ३ हृषीक म्हणजे इंद्रियें त्यांचा. स्वामी श्रीकृष्ण. ५ कोमल. ६ मुगुट. ७ मेघाप्रमाणे नीलवर्ण म्हणून घननीळ असें नांव प्राप्त आहे. ८ श्रीकृष्ण.

तूं काळयाच्या डोहीं बुडालासी ॥ आह्मी गेंगाटल्या समयासीं ॥ हरि केला तुजकारणें ॥ ६२ ॥ आमुचा घोंगाट ऐकतां भेणें ॥ मग तुज सोडिलें कालियानें ॥ आह्मी तुजवांचविलें प्राणें ॥ ऐकतां कृष्णें हास्य केलें ॥ ६३ ॥ शिळाधारी इंद्र वर्षला आह्मी च मग गोवर्धन उचलिला ॥ तुवां लटकाच आंगोळी गोपाळा ॥ लाऊनि ठकविसी आह्मांतें ॥६४॥ ऐशा संवगडियांच्या गोष्टी ॥ ऐकतां तोपला जगजेठी ॥ तों आल्या गाकुळींच्या गोरंटी ॥ देखिल्या दृष्टीं कृष्णनाथें ॥६५॥ परमसुंदर लावण्यखाणी ॥ किंवा उतरल्या सौदामिनी ॥ किंवा आल्या स्वर्गाहूनी ॥ देवांगना साक्षात ॥ ६६ ॥ तटस्थ पाहतां कृष्णनायका ॥ ह्मणती धन्य गोकुळींच्या गोपिका ॥ परम सुकुमार लावण्यलतिका ॥ वैकुंठनायका भाळल्या ॥ ६७ ॥ असो गोकुळींच्या युवती ॥ कृष्णचरण दृढ धरिती ॥ सप्रेम कृष्णास भेटती ॥ प्रेम चित्तीं न समाये ॥ ६८ ॥ ह्मणती वेधका वनमाळी ॥ आह्मांस टाकून गोकुळीं ॥ तुह्मी द्वारका वसविली ॥ नाहीं दीधली भेट कदां ॥ ६९ ॥ असो गोपिकांचें करूनस माधान ॥ गौळियांस भेटला श्रीकृष्ण ॥ तों नंदयशोदा देखतां दुरोन ॥ धांवोन चरण हरि धरी ॥७०॥ तो पुराणपुरुष जगपाळक ॥ यशोदेचे पदीं ठेवि मस्तक ॥ येरीनें हरीचे धरोनि हस्तक ॥ क्षेमालिंगन पैं दीधलें ॥७१॥ यशोदेचे पयोधरें ॥ ते थें पान्हा फुटला सत्वर ॥ ज्यांतील अमृत क्षीराब्धि जावर ॥ बाळपणीं प्यालाअसे ॥७२॥ यशोदा ह्मणे राजीवनेत्रा ॥ निराळवर्णा कोमळगात्रा ॥ मज सांडून सुकुमारा ॥ बहुता दिवस गेलासी ॥ ७३ ॥ कृष्णा तुजवीण एक क्षण ॥ झाला आम्हांसीं पहा युगासमान ॥ हरी तुझी बाळलीला आठऊन ॥ आह्मी प्राण रक्षिले ॥ ७४ ॥ उखळीं बांधिलें तुज हृषीकेशी ॥ ह्मणोनि मजवर रुसलासी ॥ मज टाकून परदेशीं ॥ तूं द्वारकेसीं वसतोस पैं ॥७५॥ श्रीकृष्ण ह्मणे जननीलागुन ॥ तुझा पासीं लागलें माझें मन ॥ तों नंद आला जवळीं धांवोन ॥ कृष्णें चरण वंदिले ॥ ७६ ॥ जो कमलोद्भवाचा जनिता ॥ तणें आलिं

१ सुंदर स्त्रिया. २ विजा. ३ देवांच्या स्त्रिया. ४ स्तन. ५ आकाश. ६ ब्रह्मदेवाला उत्पन्न करणारा श्रीकृष्ण.

गिळानंदपिता ॥ म्हणेसुखयाश्रीकृष्णनाथा ॥ दूरटाकिलेंआह्मांतें ॥७७॥ असोहातींधरूनिनंदयशोदेसीं ॥ आणि ॥३६॥
लींवसुदेवदेवकीपासीं ॥ क्षेमालिंगनेंएकमेकासीं ॥ प्रेमादरेंदेतीतेव्हां ॥७८॥ तोंअष्टनायिकाआलियाधांवोनी ॥ आ
॥३॥ णीसोळासहस्त्रनितंबिनी ॥ हृदलागतीयशोदेचेचरणी ॥ मस्तकठेवितीआदरें ॥ ७९ ॥ सोळासहस्त्रांमाजीपट्टराणी
लावण्यखाणीमन्मथजननी ॥ तेणेंयशोदेचेचरणी ॥ मस्तकठेविलाआदरें ॥ ८० ॥ यशोदेनेरुक्मिणीहृदयींधरिली ॥
आनंदनमायेदिग्मंडळीं ॥ जैसीकौसल्येनेसीताआलिंगिली ॥ तैसीचरीतिझालीतेथें ॥८१॥ असोयावरीग्रहणींकरू
नस्नान ॥ कृष्णेंयात्राकेलीसांगदान ॥ आनकदुंदुभिउग्रसेन ॥ भिन्नभिन्नदानेंदेती ॥ ८२ ॥ अमर्यादभांडारफोडून
सुखीकेलेयाचकजन ॥ याचकांचेंसदातृप्तमन ॥ हरिवदनेंपाहतां ॥ ८३ ॥ गोकुळींचेजनआले ॥ तितुकेश्रीकृष्णेंगौ
रविले ॥ दिव्यवस्त्राभरणींतेवेळे ॥ पूजिलेगोवळेगोपाळ ॥८४॥ रुक्मिणीह्मणेयादवेंद्रा ॥ बंधूचीबरवीपूजाकरा ॥ मा
झाहेतआजिपुरलाखरा ॥ संवगडेतुमचेपाहूनी ॥ ८५ ॥ दिव्यवस्त्रेंअळंकारजेचांगले ॥ गोकुळींच्यागोपिकांसतेवेळे ॥
स्वहस्तेंदीधलेघननीळें ॥ देखतांहांसोंआलेंरुक्मिणीसीं ॥८६॥ श्रीकृष्णासह्मणेतेवेळा ॥ बरव्यागौरवाजीगोपिबाळा ॥
आपलीपूर्वओळखीसांभाळा ॥ केलासोहळाजोबाळपणीं ॥ ८७ ॥ ऐकतांरुक्मिणीच्यावचना ॥ हांसोंआलेंजगन्मो
हना ॥ सत्यभामादिसोळासहस्त्रललना ॥ हांसतीतेव्हांआनंदें ॥ ८८ ॥ नंदयशोदेचेंपूजन ॥ आपणकरीतश्रीकृष्ण
बहुतअलंकारधन ॥ नंदयशोदेससमर्पिलें ॥८९॥ कृष्णनायिकासमग्र ॥ यशोदेसींदेतीवस्त्रेंअलंकार ॥ श्रीकृष्णाचेपु
त्रपौत्र ॥ यशोदेसींभेटले ॥ ९० ॥ देवकीह्मणेयशोदेलागुन ॥ त्वांदेखिलेंहरीचेंबाळपण ॥ कृष्णासींकरविलेंस्तनपा ॥ ३ ॥
न ॥ तूंचधन्यात्रिभुवनीं ॥ ९१ ॥ कंसेंआपटिलींसहाबाळें ॥ कृष्णाऐसींसुंदरसांवळें ॥ सांगतांदेवकीसरुदनआलें

१ याचका. २ प्रद्युम्नाची माता रुक्मिणी. ३ वसुदेव. ४ मुख. ५ इच्छा. ६ स्त्रिया. ७ पुत्रापासून जो पुत्र उत्पन्न होतो त्यास पौत्र ( नातु ) असें नाव.

दुःखआठवलेंबंदिशाळेचें ॥ ९२ ॥ देवकीह्मणेयदुवीरा ॥ तुवांगुरुपुत्रआणिलामाघारा ॥ तुजहूनज्येष्ठसुकुमारा ॥ कं
सेंपूर्वींमारिलीं ॥ ९३ ॥ तींमाझींमजआणुनी ॥ सत्वरभेटवीचक्रपाणी ॥ मगबोलेकैवल्यदानी ॥ देवकीप्रतितेधवां ॥
॥ ९४ ॥ मातेआतांचपाहेंनवल ॥ तुजभेटवितोंसाहीबाळ ॥ यमासींआज्ञाकरीघननीळ ॥ तेणेंतात्काळआणिलीं ॥
॥ ९५ ॥ साहीबाळेंआणुनी ॥ देवकीपुढेंदेतमोक्षदानी ॥ अश्चर्यकरितीदोघीजणी ॥ देवकीआणियशोदा ॥ ९६ ॥
साहीबाळेंतेवेळीं ॥ देवकीनेंहृदयींधरिलीं ॥ जनअश्चर्यकरितीसकळी ॥ अद्भुतकरणीकेलीहो ॥ ९७ ॥ पंक्तींघेऊनगो
कुळींचेजन ॥ श्रीकृष्णेंसारिलेंभोजन ॥ पंचरात्रीतेथेंक्रमून ॥ सुखदीधलेंसमस्तां ॥ ९८ ॥ याउपरीश्रीकृष्णाचीआ
ज्ञाघेउन ॥ नंदयशोदागौळीजन ॥ गोकुळासगेलेपरतोन ॥ श्रीकृष्णासआठवित ॥ ९९ ॥ सकळदळभारेंसिमधुसु
दन ॥ द्वारकेसीआलापरतोन ॥ ग्रहणयात्राजाहलीसंपूर्ण ॥ ब्रह्मानंदेंकरूनियां ॥ १०० ॥ यावरीएकेदिनींकृष्णसु
त ॥ वनक्रीडेसिगेलेसमस्त ॥ कंदुकखेळतखेळत ॥ अरण्यांतधांवती ॥ १ ॥ कंदुकखेळतांउसळला ॥ महाकूपांमा
जीपडिला ॥ सकळयादवतेवेळा ॥ कूपाआंतविलोकिती ॥ २ ॥ आंतकिंचितनसेनीर ॥ माजीसरडपडिलापर्वताकार
महाविशाळभयंकर ॥ उघडूननेत्रविलोकीत ॥ ३ ॥ यादवह्मणतीजन्मवरीपाही ॥ येव्हडासरडदेखिलानाहीं ॥ ए
कधांऊनलवलाही ॥ कृष्णासींसांगतीनवलहें ॥ ४ ॥ बळिसहितकर्मलावर ॥ तेथेंपहावयाआलेसत्वर ॥ कूपामाजी
कौस्तुभधर ॥ पाहेसादरविलोकुनी ॥ ५ ॥ कृष्णदृष्टींपडतांसाचार ॥ तात्काळजाहलात्याचाउद्धार ॥ पावोनियांदि
व्यशरीर ॥ कूपाबाहेरपातला ॥ ६ ॥ जोब्रह्मादिकांवंद्यपूर्ण ॥ क्षीराब्धिवासीनारायण ॥ त्याचेधरिलेदृढचरण ॥ प्रे
मेंकरूनतयानें ॥ ७ ॥ उभाठाकलाजोडूनकर ॥ मगतयासींपुसेश्रीधर ॥ तूंकोणयेथेंसांगवीर ॥ कायप्रत्युत्तरबोलेतो

१ सांदीपनि ऋषीचा. २ श्रीकृष्ण. ३ मधु नांवाच्या दैत्यास मारणारा ( श्रीकृष्ण. ) ४ ... . ५ विहीर. ६ उदक ७ सत्वर. ८ लक्ष्मीपति श्रीकृष्ण. ९ कौस्तुभमणी.

॥ ८ ॥ ह्मणेमाझेंनावनृगनृपवर ॥ पुंण्यपंथेंवर्त्ततांसाचारे ॥ मध्येंएकअपायघडलाथोर ॥ जाहलाकहरमजवरी ॥ ९ ॥ एकयामहापर्वकाळीं ॥ ब्राह्मणबोलाऊनसकळी ॥ तयांसींसहस्त्रगोदानेंअर्पिलीं ॥ सवत्सविधिप्रकारें ॥ १० ॥ पूजामानपावोनब्राह्मण ॥ गेलेआश्रमासींगाईघेउन ॥ त्यांतएकयाऋषीचीगायपळोन ॥ आलीकळपांतआमुच्या ॥ ११ ॥ तोंदुसरेदिवसींकरूनस्नान ॥ आणीकएकब्राह्मणालागुन ॥ तेचिगायदिधलीनेणोन ॥ मगतोब्राह्मणआलापहावया ॥ १२ ॥ तेणेंयेऊनतीगायधरिली ॥ ह्मणेहेमाझीपळोनआली ॥ ब्राह्मणह्मणेमजआतांदिधली ॥ मीनसोडींसर्वथा ॥ १३ ॥ एकासएकभांडतीब्राह्मण ॥ म्यांधरिलेदोघांचेचरण ॥ पहिल्याब्राह्मणाससहस्त्रगोदान ॥ द्यावयासिद्धजाहलों ॥ १४ ॥ तोह्मणेमीनघेंईसर्वथा ॥ माझीचमजदेईआतां ॥ तोंदुसऱ्याब्राह्मणासींप्रार्थितां ॥ तोहीसर्वथानायके ॥ १५ ॥ दोघेहीविप्रभांडतां ॥ नराहतीचराहवितां ॥ दोघेक्षोभोनकृष्णनाथा ॥ मजशापशस्त्रेंताडिलें ॥ १६ ॥ ह्मणतीमहासरडहोऊन ॥ कूपामाजीपडेबहुतदिन ॥ म्यांधरिलेत्यांचेचरण ॥ मागुतीवचनबोलिले ॥ १७ ॥ पुढेंअवतरेलश्रीकृष्ण ॥ जोपूर्णब्रह्मसनातन ॥ त्याचीदृष्टीपडतांउद्धरोन ॥ जासीलतेव्हांस्वर्गातें ॥ १८ ॥ यादवांसींह्मणेकृष्णनाथ ॥ पहाअन्यायतरीकिंचित ॥ केव्हढाजाहलाअनर्थ ॥ पुंण्यपुरुषारायातें ॥ १९ ॥ यालागींब्राह्मणासींभिऊन ॥ वर्त्ततुह्मीसावधान ॥ हेंअसोतात्काळविमान ॥ रायाकारणेंपातलें ॥ २० ॥ नमस्कारूनहरीचेचरण ॥ नृगराजागेलाउद्धरोन ॥ हरिपदप्रसादेंकरून ॥ इंद्रभुवनींराहिला ॥ २१ ॥ द्वारकेंतप्रवेशलाकृष्णनाथ ॥ तोंभेटीसआलावीरपार्थ ॥ चतुररणपंडितसुभद्राकांत ॥ आवडेबहुतश्रीकृष्णा ॥ २२ ॥ श्रीकृष्णेंआवडीकरून ॥ हृदयींआलिंगिलाअर्जुन ॥ परमप्रीतीदोघांलागुन ॥ पंक्तीसभोजनशेजारीं ॥ २३ ॥ एकाआसनींदोघांसबैसणें ॥ एकेतल्पकींनिद्राकरणें ॥ गुह्यगोष्टीवो



१ मार्ग. २ विप्र. ३ वासुरें. ४ पाय. ५ ब्राह्मण. ६ विहीर. ७ निराकार व पुराण पुरुष. ८ अर्जुन. ९ शय्या, पलंग.

ळणे ॥ दोघेजणेंएकांतीं ॥ २४ ॥ तोंद्वारकेमाजीएकब्राह्मण ॥ त्याचींआठबाळेंगेलींसटवोन ॥ मागुतीस्त्रीप्रसूतहोऊ
न ॥ नववापुत्रजाहला ॥ २५ ॥ ब्राह्मणश्रीरंगाजवळीआला ॥ बाळांचावृत्तांतसांगीतला ॥ हरिजेपांचवेदिवसींपुत्र
जातातयाला ॥ उपायमजलासांगाकांहीं ॥ २६ ॥ आतांस्त्रीजाहलीप्रसूत ॥ एव्हडातरीराखेंसुत ॥ तोंगर्वेंबोलेवीर
पार्थ ॥ मीरक्षीनबाळतुझें ॥ २७ ॥ ब्राह्मणाच्याघरासआलाअर्जुन ॥ ह्मणेमीबाळकाचारक्षीनप्राण ॥ यमकाळउभे
चिरीन ॥ निजसामर्थ्येंकरूनियां ॥ २८ ॥ मीअसतांसामर्थ्यवंत ॥ कायकरीलयमदूत ॥ कैसासटवेलविप्राचासुत ॥
तोआजिसत्यपाहेनमी ॥ २९ ॥ जरीयाबाळाचाजाईलप्राण ॥ तरीमीहाअग्निकाष्ठेंभक्षीन ॥ ऐसाकरूनियांपण ॥ र
क्षीअर्जुनसभोंवतें ॥ ३० ॥ विप्राच्यागृहावरूनिथोर ॥ दृढरचिलेंबाणांचेंमंदिर ॥ दिव्यमंत्रजपोनसत्वर ॥ दिग्बंध
नपार्थकरी ॥ ३१ ॥ धनुष्यासलाऊनिबाण ॥ द्वारींरक्षितअर्जुन ॥ तोंप्रवर्तलापांचवादिन ॥ गेलाप्राणबाळकाचा
॥ ३२ ॥ जननोपिटीवक्षस्थळ ॥ अहारेअर्जुनासटवलेंबाळ ॥ पार्थक्षोभलाप्रबळ ॥ गेलातात्काळयमपुरीं ॥ ३३ ॥
यमासपुसेवृत्तांत ॥ तोह्मणेनवहीबाळेंयेथ ॥ म्यांआणिलींनाहींसत्य ॥ जाणयथार्थकपिध्वजा ॥ ३४ ॥ बाळकाकार
णेंतवेळे ॥ स्वर्गमृत्युपाताळशोधिलें ॥ चौदालोकांसझाडेघेतले ॥ परीबाळेंनसांपडती ॥ ३५ ॥ आलाद्वारकेसपरतो
न ॥ मगचेतविलमहाअग्न ॥ प्राणद्यावयासोअर्जुन ॥ सिद्धजाहलातेकाळीं ॥ ३६ ॥ वृत्तांतएकोनसर्वेश्वर ॥ पार्थाजव
ळीआलासत्वर ॥ कपिध्वजेंवृत्तांतसमग्र ॥ श्रीरंगासीसांगीतला ॥ ३७ ॥ मगदिव्यरथसजऊनपारेकर ॥ श्रीकृष्णें
आणविलासत्वर ॥ त्यावरीकमळांवरसुभद्रावर ॥ बैसोनियांचालिले ॥ ३८ ॥ पवनवेगेंरथजात ॥ पृथ्वीमंडळउल्लंघो
त्वरित ॥ सप्तसमुद्रअद्भुत ॥ क्रमूनमागेंटाकिले ॥ ३९ ॥ सप्तावरणेंभेदून ॥ जेथेंवसेआदिनारायण ॥ तेथेंनेऊनि

१ ब्राह्मण. २ दिवस. ३ त्यांच्या रथाच्या ध्वजावर मारुति रहातो म्हणून अर्जुनास कपिध्वज हें नाम प्राप्त झालें. ४ श्रीकृष्ण. ५ वायु.

अर्जुन ॥ उभाकेलाश्रीकृष्णें ॥ ४० ॥ कोटिसूर्याचीप्रभाजायलपोन ॥ ऐसाशेषशायीनारायण ॥ त्याचियापदअंगु
ष्ठावरून ॥ ब्रह्मांडचिओवाळिजे ॥ ४१ ॥ तेंस्वरूपतेजअपार ॥ नेत्रींपाहूंनशकेमित्र ॥ त्याचेस्वरूपींवसुदेवपुत्र ॥
मिळोनिगेलाएकलें ॥४२॥ परमघाबिराजाहलाअर्जुन ॥ पाहेतंवजवळीनाहींश्रीकृष्ण ॥ अद्भुततेजनलक्षवेपूर्ण ॥ झां
कीनयनभयेंतेव्हां ॥ ४३ ॥ नयनझांकूनपंडुसुत ॥ श्रीकृष्णनामेंहाकदेत ॥ ह्मणेकैवारियाधांवत्वरित ॥ कांमजयेथें
सांडिलें ॥ ४४ ॥ मंगळधामाराजीवनेत्रा ॥ पुराणपुरुषास्मरारिमित्रा ॥ मन्मथजनकादेवकीपुत्रा ॥ धांवसत्वरमज
लागीं ॥४५॥ जलजोद्भवजनकामधुसूदना ॥ पांडवरक्षकाभक्तजनरंजना ॥ समरधीरादानवभंजना ॥ काढीमजयेथुनी
॥ ४६ ॥ कासावीसजाहलापार्थ ॥ मगप्रगटलाकृष्णनाथ ॥ दिव्यचक्षुतयासींदेत ॥ ह्मणेपाहेअद्भुततेजमाझें ॥ ४७॥
मगपार्थेंउघडिलींनेत्रकमलें ॥ दिव्यस्वरूपन्याहाळिलें ॥ तंवतेथेंनवहीबाळें ॥ ब्राह्मणाचींखेळती ॥ ४८॥ मगस्तवूनि
आदिनारायण ॥ नवहीबाळेंघेतलींमागोन ॥ रथींबैसोनकृष्णार्जुन ॥ आलेपरतोनद्वारकेसीं ॥ ४९ ॥ अर्जुनाजवळीं
नवहीबाळें ॥ श्रीकृष्णेंदीधलींतयेवेळे ॥ मगब्राह्मणासबोलाविलें ॥ स्त्रीसहिततेधवां ॥५०॥ उभयतासपुजूनपार्थ ॥
समर्पिलेनवहीसुत ॥ ब्राह्मणआनंदेंबहुत ॥ यशवर्णितपार्थाचें ॥ ५१ ॥ ब्राह्मणगेलागृहासीं ॥ मगअर्जुनह्मणेहृषीके
शी ॥ तुझीलीलाब्रह्मादिकांसीं ॥ पाकशासनासींअगम्य ॥ ५२ ॥ श्रीकृष्णह्मणेपार्था ॥ सर्वस्वरूपेंमीचधरिता ॥ ये
थेंदुजयाचीनाहींवार्ता ॥ कर्ताहर्तामीचपैं ॥ ५३ ॥ असोआज्ञाघेऊनअर्जुन ॥ इंद्रप्रस्थासींगेलापरतोन ॥ सकळअ
भिमानगळून ॥ कृष्णस्मरणींवर्ततसे ॥ ५४ ॥ श्रीधरश्रोतयांविनवीत ॥ संपतआलाहरिविजयग्रंथ ॥ परीएकअनु ॥५॥
संधानींसंमत ॥ पद्मपुराणींचेंसूचलें ॥ ५५ ॥ पद्मपुराणींपांडुरंगमहात्म्य ॥ तेथेंहीकथाआहेउत्तम ॥ श्रोतींपरिसि

१ सूर्य. २ कमल. ३ शंकर. ४ प्रद्युम्नाचा पिता श्रीकृष्ण. ५ कामदेवाचा बाप. ६ युद्ध. ७ दैत्य. ८ इंद्र.

जेसप्रेम ॥ अत्यादरेंकरूनियां ॥ ५६ ॥ शचीशक्राचीअंगना ॥ तीएकदांगेलीविष्णुभुवना ॥ तोंदेखिलेवैकुंठराणा
लक्ष्मीसहिततेवेळा ॥ ५७॥ करूनियांहरीसनमन ॥ उभीठाकलीकरजोडुन ॥ परीशचीचेंइच्छीमन ॥ अर्धांगींबैसे
नहरीच्या ॥ ५८ ॥ हापरमात्माआदिनारायण ॥ जरींमीयाच्याअर्धांगींबैसेन ॥ तरींभाग्यपरिपूर्ण ॥ मगजगज्जी
वनबोलत ॥ ५९ ॥ हरिह्मणेतेअवसरीं ॥ शचीतुवांजेंइच्छिलेंअंतरीं ॥ साठीसहस्त्रवर्षेंतपकरी ॥ हिमगिरीपाठारींम
जलागीं ॥ १६० ॥ पुढेंमीधरीनकृष्णावतार ॥ गोकुळींकरीनलीलाचरित्र ॥ तूंराधाहोऊनसत्वर ॥ प्रगटेमगव्रजातें
॥ ६१ ॥ तेथेंमीतुजवरीन ॥ मगमीकंसवधासीजाईन ॥ तेवेळेंतूंगुप्तहोउन ॥ द्वारकेयेईवेगेंसीं ॥ ६२ ॥ ऐसावरपा
वोनितेअवसरीं ॥ इंद्राणीनिर्धारेंतपकरी ॥ तेप्रगटलीगोकुळाभीतरीं ॥ भोगिलामुरारींकुंजवनीं ॥ ६३ ॥ मगमथुरे
सिजातांहृषीकेशी ॥ वियोगनसाहवेराधेसीं ॥ गुप्तहोऊनिहिमाचळासीं ॥ मागुतीतपासींतेगेली ॥ ६४ ॥ मगतेदि
व्यतपकरूनी ॥ तेचआलीद्वारकेलागुनी ॥ श्रीकृष्णेंराधेसींदेखोनी ॥ आलिंगूनिअंकींबैसविली ॥ ६५ ॥ अद्यापिद्वा
रकेसींजाण ॥ श्रोतींपहावेंजाऊन ॥ होतेंराधाकृष्णपूजन ॥ सर्वजनदेखतीतें ॥ ६६ ॥ असोअर्धांगींराधाघेउनी ॥
बैसलाअसतांचक्रपाणी ॥ तेथेंआलीरुक्मिणी ॥ हरिचरणपहावया ॥ ६७॥ जरीसोळासहस्त्रगोपिकाअसती ॥ स
त्यभामादिसकळयुवती ॥ परीत्याहींयेतांरुक्मिणीसती ॥ नबैसतीहरिअंकीं ॥६८॥ रुक्मिणीयेतांचसकळा ॥ उभ्या
राहतीगोपबाळा ॥ सर्वांदेखतांचित्कळा ॥ हरिअर्धांगींबैसत ॥ ६९ ॥ सर्वांदेखतांबैसेरुक्मिणी ॥ परीतिजदेखतन
बैसेकोणही ॥ हेज्ञानकळापट्टराणी ॥ इचीसरीकोणीनपावत ॥ १७० ॥ असोरुक्मिणीआलीजोंएकदां ॥ तोंहरीचेअ
र्धांगींबैसलीराधा ॥ नधरीरुक्मिणीचीमर्यादा ॥ चढलीक्रोधाभीमकी ॥ ७१ ॥ पुढीलभविष्यजाणुनी ॥ तात्काळरु

१ इंद्राणी. २ स्त्री. ३ वैकुंठास. ४ उदकामध्यें वास करतो ह्मणून नारायण असें ह्मणतात. ५ मन. ६ पर्वत. ७ मांडीवर. ८ नायका. ९ बरोबरी. १० रुक्मिणी.

क्मिणीगेलीरुसोनी ॥ दक्षिणदिंडीरवनींयेउनी ॥ तपकरीतबैसली ॥ ७२ ॥ दिंडीरवनतेंचपंढरी ॥ भीमातिरींभीम
कीतपकरी ॥ मजयेथेंपहावयायेईलमुरारी ॥ द्वारकेहूनआपणची ॥ ७३ ॥ मगदिंडीरवनांत ॥ भीमककन्यातपकरि
त ॥ तोंद्वारकेसींकृष्णनाथ ॥ कायकारेंताजाहला ॥ ७४ ॥ रुक्मिणीजातांद्वारकेहुनी ॥ कळाहीनसकळकामिनी ॥
तेसर्वसौभाग्यखाणी ॥ गेलीरुसोनभीमातटा ॥ ७५ ॥ मगरुक्मिणीकारणेंकृष्णनाथ ॥ सर्वउर्वीमंडळशोधित ॥ तों
गोकुळासीआलात्वरित ॥ बाळवेषधरीतेव्हां ॥ ७६ ॥ सवेंगाईगोपाळघेउनी ॥ दक्षिणदिशेआलाचक्रपाणी ॥ शोधी
तवनींउपवनीं ॥ तेरुक्मिणीचित्कळा ॥ ७७ ॥ गोरक्षणाचावेत्रकरीं ॥ तोचिदंडधारीपूतनारी ॥ शंखतोकमंडलुनि
र्धारी ॥ संन्यासीहरिजाहलाअसे ॥ ७८ ॥ श्रीवत्सांकितमनोहर ॥ मुगुटकुंडलेंमकराकार ॥ नीळजीमूतवर्णश्रीधर
बाळदिगंबरजाहला ॥ ७९ ॥ शोधीतशोधीतहृषीकेशी ॥ आलालोहदंडक्षेत्रासीं ॥ दिंडीरवनह्मणतीत्यासीं ॥ तेथेंद्वा
रकावासीप्रवेशला ॥ १८० ॥ मागेंटाकूनगाईगोपाळ ॥ त्यावनांतप्रवेशेघननीळ ॥ तोंतेथेंबैसलीवेल्हाळ ॥ तपकरी
तएकांतीं ॥ ८१ ॥ अंकांतरींधरूनवेत ॥ दोन्हीकटींठेऊनहस्त ॥ रुक्मिणीचेंवदनविलोकित ॥ उभाराहिलातेथेंची
॥ ८२ ॥ ह्मणेपद्मनेत्रेकामिनी ॥ कांबैसलीसयेउनी ॥ मजनगमेतुजवांचुनी ॥ ह्मणोनधांऊनएथेंआलों ॥ ८३ ॥ ह्मणे
प्रियेतुजवांचुन ॥ मजयुगासमानवाटेक्षण ॥ मगरुक्मिणीबोलेवचन ॥ तूंकोणआहेसीसांगपां ॥ ८४ ॥ चोरटियासा
रिखाअकस्मात ॥ उभाठाकलासीयावनांत ॥ परांगनेसींबोलावयामात ॥ कायकारणतुजअसे ॥ ८५ ॥ परनारीसीं
प्रियाह्मणसी ॥ मजऐसेंवाटतेंमानसीं ॥ बहुतेकपरद्वारीआहेसी ॥ बाळपणापासूनी ॥ ८६ ॥ ऐकोनभीमकीचेंवच ॥ ६ ॥
न ॥ हास्यकरीतमधुसूदन ॥ मगहृदयींदृढआलिंगून ॥ केलेंसमाधानतियेचें ॥ ८७ ॥ तोंपुढेंपुंडलीकभक्त ॥ माता
पितयांचीसेवाकरित ॥ तेणेंतोषलाजगन्नाथ ॥ जाऊनतेथेंउभाठाके ॥८८॥ हरिम्हणेधन्यधन्यपुंडलीका ॥ वरमागेंभ

क्तटिळका ॥ येरेंवीटटांकिलींवैकुंठनायका ॥ बैसावयाकारणें ॥ ८९ ॥ त्याविटेवरीपदजोडुनी ॥ दोन्हीकरकटींठेउ नी ॥ उभाराहिलामोक्षदानी ॥ पुंडलिकासम्याहाळित ॥ ९० ॥ मातापितयांचीसेवाकरूनी ॥ हरिसमीपआलापुंडलि कमुनी ॥ प्रेमेंलागलादृढचरणीं ॥ मगमोक्षदानीबोलत ॥ ९१ ॥ पुंडलिकावरमागयेचक्षणीं ॥ येरूम्हणेजैसाआहेस चक्रपाणी ॥ तैसाचिरकाळयेस्थानी ॥ उभाराहेंभगवंता ॥ ९२ ॥ जेतुझ्यादर्शनासियेती ॥ ज्ञानहीनमूढमती ॥ त्यां सींदर्शनेंव्हावीमुक्ती ॥ हेचिविनंतीमाझीअसे ॥ ९३ ॥ आणियाक्षेत्राचेंनामपंढरीनगर ॥ दक्षिणद्वारकानामसाचा र ॥ रुक्मिणीसहिततूंसर्वेश्वर ॥ राहेंस्थिरयेथेंची ॥ ९४ ॥ विठ्ठलनामअभिधान ॥ चालवावेंआतांयेथुन ॥ मजकोठें नजावेंसोडुन ॥ कृपाळुवासर्वेशा ॥ ९५ ॥ म्हणूनदक्षिणद्वारकापंढरी ॥ जेविख्यातभूमंडळावरी ॥ सकळद्वारकेचीसं पदामुरारी ॥ आणिततव्हांपंढरियेे ॥ ९६ ॥ हाभीमातीरदिगंबर ॥ आदिपुरुषपरात्पर ॥ आनंदसांप्रदायथोर ॥ तेथूनियांवाढला ॥ ९७ ॥ मूळगुरुआदिनारायण ॥ प्रथमशिष्यचतुरानन ॥ आपलेंजेंगुह्यज्ञान ॥ ठेविलेंपूर्णज्यापा सीं ॥ ९८ ॥ तेंचब्रह्मवंद्यनिजज्ञान ॥ अत्रीसदिधलेंप्रीतीकरून ॥ त्याचेपोटींपरब्रह्मपूर्ण ॥ दत्तात्रेयअवतरला ॥ ९९ ॥ अवतारउदंडहोऊनगेले ॥ परीदत्तात्रेयरूपआहेसंचलें ॥ अत्रीनेंज्ञानठेविलें ॥ दत्तात्रेयींसर्वतेवेळा ॥ २०० ॥ याद त्तात्रेयापासून ॥ सदानंदींबिंबलेंज्ञान ॥ तेंचिरामानंदींठसावोन ॥ परिपूर्णपसरलें ॥ १ ॥ तेथूनअमळानंदयतीश्वर जोगंभीरपणेंजैसासागर ॥ तेथूनज्ञानसमग्र ॥ ब्रह्मानंदअवतरले ॥ २ ॥ तेथूनसहजानंदमुनी ॥ ज्याचीसमाधीआ हेकल्याणी ॥ तेथूनपूर्णानंदपूर्णपणी ॥ अवतरलायतिराज ॥ ३ ॥ तेथूतदत्तानंदतत्वतां ॥ जोश्रीधराचेपितयाचापि ता ॥ श्रीदत्तात्रेयचिमागुता ॥ अवतरलासहजास्थिती ॥ ४ ॥ तेथूनब्रह्मानंदसद्गुरू ॥ जोज्ञानाचामहामेरू ॥ श्रीधर वरदानिर्विकारू ॥ भीमातीरविलासीजो ॥ ५ ॥ शालिवाहनशकेसोळाशेंचोवीस ॥ चित्रभानुनामसंवत्सरास ॥ शुद्ध

द्वितीयामार्गशीर्षमास ॥ तेदिवशींग्रंथसंपला ॥६॥ श्रीपांडुरंगवरदेंकरून ॥ पंढरीसग्रंथजाहलानिर्माण ॥ एकदांश्रवण करितांपरिपूर्ण ॥ पापेंदारुणभस्महोती ॥ ७ ॥ तीनआवर्तनेंवाचितांपवित्र ॥ कुळींहोयदिव्यपुत्र ॥ तोभक्तराजमहाचतुर ॥ होईलऐसेंजाणिजे ॥ ८ ॥ एकआवर्तनकरितां ॥ हरेघोरसंकटचिंता ॥ शत्रुपराजयतत्वतां ॥ श्रवणकरितांहरिविजय ॥ ९ ॥ कामक्रोधमदमत्सर ॥ हेचिशत्रुअनिवार ॥ यांचापराजयहोईलसाचार ॥ श्रवणकरितांभावार्थें ॥ ॥ १० ॥ हरिविजयकरितांश्रवण ॥ हरेलसकळऋणअथवारोगदाण ॥ आपणप्रगटोनिश्रीकृष्ण ॥ संकटेंत्यांचींनिरसील ॥ ११ ॥ छत्तीसअध्यायग्रंथतत्वतां ॥ प्रीतिपावोपंढरीनाथा ॥ याग्रंथासमूळकर्ता ॥ पंढरीनाथजाणिजे ॥१२॥ जेंजेंविठ्ठलेंकर्णींसांगितलें ॥ तेंतेंयेथेंपत्रींलिहिलें ॥ न्यूनअथवाआगळें ॥ त्याचेंतोचजाणेपैं ॥ १३ ॥ दशमआणिहरिवंश ॥ पद्मपुराणींच्याकथाविशेष ॥ त्याचहरिविजयींसुरस ॥ श्रोतींसावकाशपरिसावें ॥ १४ ॥ छत्तीसअध्यायहरिविजय ॥ पांडुरंगासींपरमप्रिय ॥ हाग्रंथसंग्रहतांतेंघरनिर्भय ॥ सदांविजयहोइजे ॥ १५ ॥ हरिविजयग्रंथभांडार ॥ छत्तीसकोठड्यांचेंपरिकर ॥ माजीरत्नेंभरलींनानाप्रकार ॥ जोहरीसंतपरीक्षक ॥ १६ ॥ छत्तीसतत्वेंहींसाचार ॥ कींछत्तीसखणाचेंदामोदर ॥ कींछत्तीसगंगामिळोनिसमग्र ॥ हरिविजयसमुद्रभरला ॥१७॥ कींछत्तीसकोहळींधन ॥ दीधलेंब्रह्मानंदेंदाउन ॥ कींछत्तीसखणांचेंवृंदावन ॥ निजभक्तसंपूर्णतुळसीवरी ॥ २१८ ॥ कींहरिविजयग्रंथराजेंद्र ॥ हेछत्तीसजाणात्याचेमहावीर ॥ करितीसकळपापांचासंहार ॥ प्रतापधीरमहायुद्धीं ॥ २१९ ॥ हरिविजयहेंचिआकाश ॥ तेथेंहेछत्तीसचंडांश ॥ ब्रह्मांडभेदूनप्रकाश ॥ पलीकडेजायपैं ॥ २० ॥ कींछत्तीसवृक्षांचेंवन ॥ कींछत्तीसक्षेत्रेंपिकलींपूर्ण ॥ कींहेंपदकदेदीप्यमान ॥ छत्तीसरत्नांचेंजडियेलें ॥२१॥ कींहाप्रयागराजथोर ॥ भावमाघमासअतिपवित्र ॥ स्नानकरीपुंण्यवंतनर ॥ अर्थीबुडीदेऊनियां ॥२२॥ कींहाभवरोगावरीदिव्यरस ॥ बुद्धिमंदासहोय

॥७॥

मतिप्रकाश ॥ शुकसांगेपरीक्षितीस ॥ वारंवारगौरऊन ॥२३॥ प्रथमाध्यायींमंगळाचरण ॥ गणेशसरस्वतीसंतवर्ण
न ॥ गुरुमहिमासांगोन ॥ प्रथमाध्यायसंपविला ॥ २४ ॥ दैत्यपृथ्वीवरीमाजले ॥ ह्मणोनिदेवक्षीरसागरासींगेले ॥
स्तवनकरूनसुरवरपरतले ॥ ऐसेंहेंकथिलेंद्वितीयाध्यायीं ॥ २५ ॥ वसुदेवाचेंलग्न ॥ अवतरलेशेषनारायण ॥ गो
कुळासींगेलेजगजीवन ॥ हेंनिरोपणतिसऱ्यांत ॥२६॥ गर्गेंवर्णिलेंजातक ॥ पाळणानिजविलावैकुंठनायक ॥ पूतना
शोषिलीनि:शंक ॥ चौथ्यांतहेंकथिलेंअसे ॥ २७ ॥ पांचव्यांततृणावर्त्तयेउन ॥ श्रीकृष्णासनेलेंउचलोन ॥ नानाक्री
डारसदाउन ॥ मोहिलेंमनसर्वांचें ॥ २८ ॥ साहव्यांतवनमाळी ॥ चोरीकर्मेंकेलीगोकुळीं ॥ गोपीनीगाऱ्हाणींसांगी
तलीं ॥ कौतुकेंकरूनियशोदेसीं ॥२९॥ सातव्यांतहेंकथन ॥ दशावतारलीलापूर्ण ॥ गोपींसदावीश्रीकृष्ण ॥ सांग
तीपूर्णयशोदेसीं ॥३०॥ आठव्यामाजीकथन ॥ पद्मपुराणींचेंसंमतपूर्ण ॥ राधेनेंकृष्णघरासनेउन ॥ खेळविलाबहुसाल
॥ ३१॥ नवव्यांतहेचिकथेचीप्रौढी ॥ कृष्णेंकेल्याबहुतखोडी ॥ मायाउखळींबांधेतांतडी ॥ यमलार्जुनउद्धारिले ॥३२ ॥
दाहाव्यांतगोपाळकालाकरून ॥ वनक्रीडाकरीनारायण ॥ कमलोद्भवेंकेलेंवत्सहरण ॥ करीस्तवनप्रीतीनें ॥३३॥ अ
कराव्यांतकालियामर्दन ॥ बाराव्यांतगोवर्धनोद्धारण ॥ तेराव्यांतकंसदूतमर्दून ॥ गोरक्षणकेलेंपैं ॥ ३४ ॥ चौदाव्यांत
अघासुरमर्दन ॥ नंदयमुनेंतगेलाबुडोन ॥ तोमाघाराआणिलानारायणें ॥ वरुणापासींजाऊनियां ॥ ३५ ॥ पंधरा
व्यांतहेंचिकथन ॥ कृष्णेंघतलेंदेवकीचेंवाण ॥ वनांतमागेराधेसींहरिदान ॥ तेंचवर्णनबहुतअसे ॥ ३६ ॥ सोळाव्यां
तयज्ञपत्न्यांनींयेउन ॥ हरीससमर्पिलेंअन्न ॥ रासक्रीडासंपूर्ण ॥ सत्राव्यांतकथियेली ॥ ३७ ॥ अठराव्यांतनिरू
पण ॥ अक्रूरकृष्णासगेलाघेउन ॥ एकुणविंशतीअध्यायींकंसवधून ॥ राज्यदिधलेंउग्रसेना ॥ ३८ ॥ विसावाअध्या
यअतिसुरस ॥ श्रीकृष्णशरणसांदीपनास ॥ अद्भुतकथिलाज्ञानेंरस ॥ गुरुशिष्यलक्षणें ॥ ३९ ॥ एकविसाव्यांतउ

द्वेयेउन ॥ गोपींसकथिलेंब्रह्मज्ञान ॥ बाविसाव्यांतजरासंधपराभवून ॥ काळयवनभस्मकेला ॥ २४० ॥ तेविसा
वाचोविसावासार ॥ येथेंकथिलेंरुक्मिणीस्वयंवर ॥ पंचविसाव्यांतसर्वेश्वर ॥ जांबुवतीपर्णूनिआणिली ॥ ४१ ॥ स
व्विसाव्यांतकृष्णनायिका ॥ आणिल्याषोडशसहस्त्रगोपिका ॥ सत्ताविसाव्यांतरुक्मिणीविनोददेखा ॥ आणिप्रद्युम्न
उपजला ॥ ४२ ॥ अठ्ठाविसाव्यांतउखाहरण ॥ भुजाछेदूनत्रासिलाबाण ॥ येकुणतिसाव्यांतदरिद्रहरण ॥ सुदाम
याचेंकेलें ॥ ४३ ॥ तिसाव्यांतसत्यभामेचाविनोद ॥ नारदासींदानदिधलागोविंद ॥ एकतिसाव्यांतगरुडाचागर्व
मद ॥ हनुमंताहातींहरियेला ॥ ४४ ॥ बत्तिसाव्यांतसुभद्राहरण ॥ नारदासींघरोघरींकृष्णदर्शन ॥ तेतिसाव्यांतरा
जसूययज्ञ ॥ जरासंधामारविलें ॥ ४५ ॥ चौतिसाव्यांतकथानिश्चिती ॥ वाढीतअसतांद्रौपदीसती ॥ बिरडेंसुटतां
श्रीपती ॥ चतुर्भुजकरीतेव्हां ॥ ४६ ॥ पस्तिसावाअध्यायमयसभावर्णन ॥ शिशुपाळवक्रदंतवधून ॥ विजयीजाह
लामधुसूदन ॥ हेचिकथाअसंभाव्य ॥ ४७ ॥ छत्तिसाव्यांतग्रहणयात्राकरून ॥ भेटलेगोकुळींचेजन ॥ याउपरीपं
ढरीसआलाश्रीकृष्ण ॥ हेंचिनिरूपणशेवटीं ॥ ४८ ॥ ऐसाछत्तीसअध्यायहाग्रंथ ॥ हरिविजययथार्थ ॥ सदांअवलो
किर्ताभक्तसंत ॥ विवेकदृष्टीकरूनियां ॥ ४९ ॥ पंढरीहूनिचारियोजनेंदूर ॥ पश्चिमेसनाझरनामनगर ॥ तेथीलदे
शलेखकसाचार ॥ ब्रह्मानंदपूर्वाश्रमीं ॥ २५० ॥ पुढेंपंढरीसजाऊन ॥ मगकेलेंसन्यासग्रहण ॥ त्यावरीभीमातिरीं
चसंपूर्ण ॥ समाधिस्थनिजसुखें ॥ ५१ ॥ तोब्रह्मानंदमहाराजपिता ॥ सावित्रीनामेंमाझीमाता ॥ श्रीधरेंवंदूनिउभ
यतां ॥ हरिविजयसंपविला ॥ ५२ ॥ सकळश्रोतयांसींआदरें ॥ साष्टांगनमूनश्रीधरें ॥ ब्रह्मानंदेंकरूनिनिर्धारें ॥ ॥ ८ ॥
हरिविजयविलोकिजे ॥ ५३ ॥ ॥ इतिश्रीहरिविजयग्रंथ ॥ संमतहरिवंशभागवत ॥ सदापरिसोतप्रेमळपंडित ॥
षट्त्रिंशतअध्यायशेवटींचा ॥ २५४ ॥ ॥ श्रीकृष्णार्पणमस्तु ॥ ॥ अध्याय ॥ ३६ ॥ ॥ ओंव्या ॥ २५४ ॥

हा ग्रंथ मुंबईंत रा०रा० गोपाळ नारायण आणि कंपनी मालक यांचेकरितां रामचंद्र कृष्ण शिंगे वेरकर यांणीं गोपाळ नारायण कंपनीच्या छापखान्यांत छापून प्रसिद्ध केला. मिति भाद्रपद वद्य ५ बुधवार शके १८०६ तारणनाम संवत्सरे ता० १० माहे सप्तेंबर सन १८८४ कालिकादेवीरोड घरनंबर १६.

